यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत मंजुर कामांना निधी उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास, बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यचमु-२०२०/प्र.क्र.८५/विजाभज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक : २२ ऑक्टोंबर, २०२१.

**संदर्भ** -
१) शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/ प्र.क्र.६०/ विजाभज-१,दिनांक २४/१/२०१८.
२) शासन शुध्दीपत्रक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/ प्र.क्र.६०/विजाभज-१, दिनांक ८/१/२०१९.
३) शासन शुध्दीपत्रक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/ प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक ८/३/२०१९.
४) शासन शुध्दीपत्रक निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/ प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक ११/९/२०१९.
५) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. यचमु-२०२०/प्र.क्र.५९/विजाभज-१, दि.३० मार्च, २०२०.
६) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. यचमु-२०२०/प्र.क्र.०३/विजाभज-१, दि.३० मार्च, २०२०.
७) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, शासन निर्णय क्र. यचमु-२०२०/प्र.क्र.२६/विजाभज-१, दि.३० मार्च, २०२०.

**प्रस्तावना** -

यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत संदर्भ क्र.०५ ते ०७ येथे नमूद शासन निर्णयांन्वये अनुक्रमे चंद्रपूर व अमरावती जिल्ह्यांमधील मुक्त वसाहतींच्या कामांना प्रशासकीय मान्यता तसेच निधी वितरणास मान्यता देण्यात आली होती. तथापि, राज्यामध्ये उद्भवलेल्या कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाच्या पार्श्वभूमिमुळे सदर कामांना सन २०२०-२१ मध्ये निधी उपलब्ध करून देता येवू शकला नाही. यास्तव, चंद्रपूर व अमरावती जिल्ह्यांकरीता खालीलप्रमाणे एकूण रू.४४०.४० (अक्षरी रूपये चार कोटी चाळीस लक्ष चाळीस हजार फक्त) निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

चंद्रपूर व अमरावती जिल्ह्यांकरीता खालीलप्रमाणे एकुण रू.४४०.४० लक्ष (अक्षरी रूपये चार कोटी चाळीस लक्ष चाळीस हजार फक्त) निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **शासन निर्णय** | **जिल्हा** | **आवश्यक निधी रू.लक्ष मध्ये** | **वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|---|
| १ | मुक्त वसाहत योजना दि.३०.०३.२०२० | चंद्रपूर | २९०.४० लक्ष | २९०.४० लक्ष |
| २ | मुक्त वसाहत योजना दि.३०.०३.२०२० | अमरावती | ९०.०० लक्ष | ९०.०० लक्ष |
| ३ | मुक्त वसाहत योजना दि.३०.०३.२०२० | अमरावती | ६०.०० लक्ष | ६०.०० लक्ष |
| | | **एकूण** | **४४०.४० लक्ष** | **४४०.४० लक्ष** |

२. संदर्भ क्र. ०१ ते ०४ मध्ये नमूद केलेल्या तसेच शासनाने यासंबंधी वेळोवेळी दिलेले आदेश / परिपत्रकाप्रमाणे निधी सन २०२१-२२ मध्ये उपलब्ध करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्च करण्यात यावा.

३. सदर कामांकरिता उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे व काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे, तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे संचालक, इतर मागासवर्ग बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

४. या प्रकरणी निधीच्या मर्यादेत निकष व प्राथम्य क्रमानुसार पात्र लाभार्थी यांची निवड करणे व त्यांना शासन निर्णय दिनांक २४/१/२०१८ व शासन शुध्दीपत्रक दिनांक ८/१/२०१९, दिनांक ८/३/२०१९ व दिनांक ११/९/२०१९ मध्ये नमूद केलेल्या तरतुदीनुसार कमाल मर्यादेत खर्च करणे अनुज्ञेय राहिल. याकरीता कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त निधी मंजूर केला जाणार नाही.

५. सदरहू योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदरहू योजनेसाठी आवश्यक असलेली तरतूद संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण हे संबंधित यंत्रणेस वितरीत करतील. संबंधित जिल्हाधिकारी व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी सर्व अटी व शर्तींच्या पुर्ततेशिवाय निधी खर्च करु नये.

६. याबाबतचा खर्च सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात मागणी झेडजी-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण, ०३ मागासवर्गाचे

कल्याण, (०१) (०३) विमुक्त जाती भटक्या जमाती यांच्याकरिता यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना (२२२५-ई ८२१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखालील तरतूदीतून भागविण्यास आणि शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.गृनियो-२०१७/ प्र.क्र.६०/ विजाभज-१, दिनांक २४/१/२०१८ रोजीचा शासन निर्णय व दिनांक ८/१/२०१९, दिनांक ८/३/२०१९ व दिनांक ११/९/२०१९ रोजीच्या शासन शुध्दीपत्रकामध्ये नमूद करण्यात आलेल्या सूचनेनुसार खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे शासनाची मंजूरी देण्यात येत आहे".

७. याद्वारे वितरीत करण्यात येणाऱ्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास सादर करावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७३४/व्यय-१४, दि.१०.०८.२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२२१५५५४७५२२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra R Gadhari

Digitally signed by Ravindra R Gadhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9668226de60c3cc5b8ccd56833c07d32831e4140f3de291d1f40d510d295643f, serialNumber=8f564edcac5a4c4a79542e69f18152eb1ab86474731f4ac3d8424b8b56a653e1, cn=Ravindra R Gadhari
Date: 2021.10.22 15:57:54 +05'30'

**( र. र. गढरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना समिती, चंद्रपूर / अमरावती .
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर / अमरावती.
४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
५. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, लातूर विभाग, चंद्रपूर / अमरावती.
६. सहायक आयुक्त, समाज कल्याण, चंद्रपूर / अमरावती.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, चंद्रपूर / अमरावती.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर / अमरावती.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
११. सह सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, इमाव, बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इमाव, बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय.
१६. स्वीय सहायक, मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग मंत्रालय.
१७. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग मंत्रालय
१७. स्वीय सहायक, सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय.
१८. निवड नस्ती, विजाभज-१.